विकास योजना - जयसिंगपूर
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम, १९६६ चे कलम-३७(२)
अन्वये फेरबदल मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-२१०५/३६२/प्र.क्र.७६०/०७/नवि-१२
दिनांक :- ०१.०१.२०१०

**शासन निर्णय :-** सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रा मध्ये प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(वि. म. सनके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
सहायक संचालक नगर रचना, कोल्हापूर शाखा, कोल्हापूर.
मुख्याधिकारी, जयसिंगपूर नगरपरिषद, जयसिंगपूर, जि.कोल्हापूर
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, कोल्हापूर शाखा, कोल्हापूर व मुख्याधिकारी जयसिंगपूर नगरपरिषद, जयसिंगपूर, यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.
निवडनस्ती (नवि-१२)

Repet Notification Dt 23.11.09

अधिसूचना

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०१.०१.२०१०

क्र. टिपीएस- २१०५/२६२/प्र.क्र.७६०/०७/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक नगर व रचना, अधिनियम १९६६

ज्याअर्थी, जयसिंगपूर शहराची विकास योजना (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिलेली) महाराष्ट्र शासनाचे नगर विकास व आरोग्य विभागाकडील अधिसूचना क्र.टिपीएस-२१७१/२४२०(बी)/नवि-७ दि.२१.०८.१९८१, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३१(१) (यापुढे उक्त अधिनियम असे संबोधिलेला) अन्वये मंजूर असून ती दि. ०१.१२.१९८१ पासून अंमलात आली आहे; (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिलेली)

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेमध्ये सिसक्र.१२४०, १२४१, १२४२, १२४३ ह्या मिळकती तसेच सिसक्र.१२३७ व १२३८ (यापुढे जिचा उल्लेख "उक्त जमिन" असा केला आहे) ह्या जमिनी सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात समाविष्ट आहेत (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त विभाग" असा केला आहे);

आणि ज्याअर्थी, जयसिंगपूर नगरपरिषदेने उक्त अधिनियमाचे कलम ३७(१) अनुसार विहीत वैधानिक कार्यवाही पूर्ण करून उक्त विकास योजनेतील उक्त जमिनीपैकी (१) सिसक्र.१२४०, १२४१, १२४२, १२४३ या मिळकती सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागातून वगळून "नगर पालिका कार्यालय व शॉपींग कॉम्प्लेक्स" या वापरासाठी राखीव ठेवणे (यापुढे ज्याचा उल्लेख उक्त फेरबदल क्र.१ म्हणून केला आहे) तसेच (२) सिसक्र.१२३७ व १२३८ या मिळकती सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागातून वगळून नगरपालिकेच्या दुकान गाळ्यांसाठी राखीव ठेवणे (यापुढे ज्याचा उल्लेख उक्त फेरबदल क्र.२ म्हणून केला आहे) याबाबतचे फेरबदल प्रस्ताव दि.०८.०२.२००५ पत्र क्र.१००३/२००४-०५ अन्वये मंजूरीसाठी शासनास सादर केलेले आहेत;

आणि ज्याअर्थी, शासनाने संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेवून व आवश्यक ती चौकशी केल्यानंतर उक्त फेरबदल क्र.१ चा प्रस्ताव सार्वजनिक हिताचा असल्याने तो मंजूर करणे आणि उक्त फेरबदल क्र.२ च्या प्रस्तावास मंजूरी देण्याचे नाकारण्यात यावे असे शासनाचे मत आहे;

आणि ज्याअर्थी, आता उक्त अधिनियमाच्या कलम ३७ चे पोट कलम (२) अन्वये प्रदत्त असलेल्या अधिकाराचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे

Notification Dt.23.11.09

(१)सिसक्र.१२४०, १२४१, १२४२, १२४३ जयसिंगपूर या मिळकती सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागातून वगळून "नगरपालिका कार्यालय व शॉपींग कॉम्प्लेक्स" या वापरासाठी राखीव ठेवण्याच्या प्रस्तावास मंजूरी देत आहे.

(२)सिसक्र.१२३७ व १२३८ जयसिंगपूर या मिळकती सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागातून वगळून नगरपालिकेच्या दुकान गाळ्यांसाठी राखीव ठेवणेच्या फेरबदल प्रस्तावास मंजूरी देण्याचे नाकारीत आहे.

त्यासाठी उक्त विकास योजनेला मंजूरी देण्याच्या उक्त अधिसूचने मध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

उक्त विकास योजनेला मंजूरी देण्याच्या उक्त अधिसूचने सोबत जोडलेल्या फेरफारांच्या अनुसूची मध्ये शेवटच्या नोंदीनंतर खाली दिलेली नवी नोंद समाविष्ट करण्यात यावी.

- नोंद -

१) जयसिंगपूर सिसक्र.१२४०, १२४१, १२४२, १२४३ या मिळकती सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागातून वगळून "नगरपालिका कार्यालय व शॉपिंग कॉम्प्लेक्स" या वापरासाठी राखीव ठेवणेत येत आहे.

टिप :- १) उक्त मंजूर फेरबदल दर्शविणारा नकाशा नागरिकांच्या अवलोकनासाठी जयसिंगपूर नगरपरिषदेच्या कार्यालयामध्ये कार्यालयीन वेळेत, एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

सदर मंजूर फेरबदलाची अधिसूचना शासनाचे वेबसाईट www.urban.maharashtra.gov.in वर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(पि. म. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.